**महाराष्ट्र राज्यातील आदिम जमाती (PVTG) (कातकरी, कोलाम व माडिया गोंड) करिता बहुउद्देशीय संकुल उभारणीकरिता सुसाध्यता तपासणेकामी समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक आजसं २०२०/प्र.क्र.३८/बांव्यक**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २६ ऑक्टोबर, २०२०

**प्रस्तावना** :-

राज्यात PVTG आदिवासी जमाती विभिन्न आदिवासी भागांमध्ये वने किंवा महसुली जमीनींवर विखुरलेल्या स्वरुपात वसलेली आहेत. आदिवासी जमातीची कुटुंबे ठराविक क्षेत्रामध्ये आढळून येत असल्यामुळे व ही क्षेत्रे अतिदुर्गम व अविकसित अशा सीमा भागामध्ये असल्यामुळे या लोकांना जीवनावश्यक सोईसुविधा उपलब्ध होणे कठीण असते. या कुटुंबातील मुलांकरिता योग्य शिक्षण, त्यांचे आरोग्य तपासणी व योग्य उपचार, दैनंदिन आवश्यक खाद्य किंवा वापर वस्तुंचा पुरवठा, मनोरंजन व करमणूक, व त्यांचे उपजीविकेवर आधारित व्यवस्था इत्यादी एका ठराविक ठिकाणी स्थापित केल्यास या समाजाकरिता एकनिष्ठ भावनेसह प्रगती होणेस चालना मिळेल. याकरिता जवळपास २०,००० कुटुंबाकरिता एक संकुल स्थापित करणे प्रस्तावित आहे. यामध्ये खालील बाबींचा समावेश असेल :-

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | निवासी शाळा (१ ली ते १२ वी) | - २५०० विद्यार्थी क्षमता | (मुला व मुलींकरीता वसतीगृहासह शाळा) |
| (२) | आरोग्य केंद्र/रुग्णालय | - १०० बेड | (स्वास्थ्य तपासणी व आरोग्य निदान केंद्रे) |
| (३) | समुदाय केंद्र | - २५० क्षमता | (मनोरंजन, करमणुक, समाजातील कार्यक्रमाकरीता) |
| (४) | सुविधा केंद्र | - ५० दुकाने | (उपजीविकेला आधार असलेली केंद्रे) |
| (५) | कर्मचारी निवासस्थाने | - २०० निवासस्थाने | (शाळा, वसतीगृहे, आरोग्य केंद्र इत्यादीकरीता शासकीय कर्मचाऱ्यांकरीता) |

(६) पाणीपुरवठा/विद्युतीकरण/सोलर संयंत्रे/STP/संरक्षण भिंत/बागबगीचा/खेळमैदाने इत्यादी.

वरीलप्रमाणे नियोजन केल्यास ज्या ठिकाणी आवश्यक जमीन उपलब्ध असेल अशा ठिकाणच्या शासकीय आश्रमशाळांना नियोजित संकुलामध्ये रुपांतरित करण्यात येऊ शकेल.

याप्रमाणे नियोजन केल्यास आदिम जमातीकरिता (PVTG) (कातकरी, कोलाम व माडिया गोंड) तालुकानिहाय ७ संकुले, ३ उपसंकुले तत्वत: उभारण्यात येऊ शकतील. याकरिता पथदर्शी प्रकल्पाच्या स्वरुपात पालघर जिल्हयातील १८०४५ कुटुंबाकरिता एक संकुल प्रस्तावित आहे. अशा प्रकारच्या संकुलाकरिता योग्य माहितीवर आधारित प्रकल्प प्रस्ताव सुसाध्यता अहवालासह तयार करणे व सादर करणेकरिता खालीलप्रमाणे समिती गठीत करण्याचे प्रस्तावित आहे.

**<u>शासन निर्णय</u>** :-

यानुषंगाने महाराष्ट्र राज्यातील आदिम जमाती करिता (PVTG) (कातकरी, कोलाम व माडिया गोंड) बहुउद्देशीय संकुल उभारणीकरिता सुसाध्यता तपासणेकामी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिका-याचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १. | श्री. भा.र.गावित, सह सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय | अध्यक्ष |
| २. | श्री. ल.गो.ढोके, उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ३. | श्री. रा.क.खटके, मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ४. | श्रीमती अशिमा मितल, प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू | सदस्य सचिव |

उपरोक्त समितीने याबाबतची सुसाध्यता तपासून आपल्या अहवालासह प्रकल्प प्रस्ताव १५ दिवसांत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२०१०२६१६४५५६९७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAVIT BHAURAO RAGHUNATH

Digitally signed by GAVIT BHAURAO RAGHUNATH
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=GAVIT BHAURAO RAGHUNATH
Date: 2020.10.26 16:49:11 +05'30'

(भा.र.गावित)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव

३. सचिव (आदिवासी विकास), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहाय्यक
४. सह सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय
५. उप सचिव (श्री. ढोके), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय
६. मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक
८. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे
९. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू
१०. निवडनस्ती (बांधकाम व्यवस्थापन कक्ष), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय